श्री.किरण कुरुंदकर, अतिकालिक सेवानिवृत्त भाप्रसे यांना करार पध्दतीने सचिव, राज्य निवडणूक आयोग या पदावर मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- बैठक-२०१८/प्र.क्र.८७/कार्या.३७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २२.१२.२०२१

संदर्भ:-१) शासन निर्णय क्रमांक बैठक-२०१८/प्र.क्र.८७/कार्या.३७, दिनांक १७/१२/२०१८
२) शासन शुध्दीपत्रक क्रमांक बैठक-२०१८/प्र.क्र.८७/कार्या-३७,दिनांक १६.०४.२०१९
३) राज्य निवडणूक आयोगाचे पत्र क्रमांक-रानिआ-२०१८/प्र.क्र.७२/का-२, दिनांक ०८/०९/२०२१.

**प्रस्तावना :**

राज्यामध्ये लोकसभा व विधानसभा निवडणुकांच्या धर्तीवर स्थानिक स्वराज्य संस्थांच्या निवडणूका निर्भय, मुक्त व पारदर्शक वातावरणात पार पाडण्यासाठी प्रत्येक राज्यामध्ये एका स्वतंत्र राज्य निवडणूक आयोगाची स्थापना करण्यात आलेली आहे (अनुच्छेद २४३ के व २४३ झेडए). तथापि, राज्य निवडणूक आयोगामध्ये सचिवांची नियुक्ती झाल्यानंतर सदरील सचिव शासकीय नियमापेक्षा कमी कालावधीतच बदली होऊन जातात. त्यामुळे कामात सातत्य ठेवण्यास अनेक अडचणी निर्माण होत असल्याने राज्य निवडणूक आयोगाच्या दैनंदिन कामकाजावर विपरीत परिणाम होत असल्याची बाब विचारात घेऊन राज्य निवडणूक आयोगामध्ये सेवानिवृत्त भा.प्र.से. अधिकारी श्री. किरण कुरुंदकर यांची दिनांक १७/१२/२०१८ च्या आदेशान्वये करार पध्दतीने नियुक्ती करण्यात आलेली होती.

२. सन **२०२१-२२** मध्ये मोठया प्रमाणात होणा-या (**१५** महानगरपालिका**, ३२३** नगर परिषदा / नगरपंचायती**, २७** पंचायत समित्या तसेच सुमारे **२०००** ग्रामपंचायतीच्या) सार्वत्रिक निवडणूका व पोटनिवडणूकांची संख्या विचारात घेऊन आणि श्री. कुरुंदकर यांच्या सेवा कालावधीतील यापुर्वीचा निवडणुकांचा व्यापक अनुभव इ.सर्व बाबी विचारात घेता राज्य निवडणूक आयोगाने त्यांना मुदतवाढ देण्याची विनंती संदर्भाधिन पत्र क्र.३ नुसार शासनास केली आहे. त्याअनुषंगाने श्री. किरण कुरुंदकर, भाप्रसे (सेवानिवृत्त) यांना सचिव, राज्य निवडणूक आयोग या पदावर करार पध्दतीने नियुक्तीचा कालावधी १ वर्षाकरीता वाढविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

(i) श्री. किरण कुरुंदकर, अतिकालिक वेतन श्रेणीतील सेवानिवृत्त भाप्रसे यांचा "सचिव, राज्य निवडणूक आयोग" या पदावरील करार पध्दतीने झालेल्या नियुक्तीचा कालावधी दिनांक १७/१२/२०२१ (म.नं.) पासून १ वर्षाकरीता वाढविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(ii) श्री. किरण कुरुंदकर, सचिव, राज्य निवडणूक आयोग यांच्या नियुक्तीस संदर्भाधिन क्रमांक १ व २ मधील अटी व शर्ती तसेच शासनाने या संदर्भात निर्गमित केलेल्या सूचना लागू राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२२३११२३००३३०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MILIND NARAYAN HARDAS

Digitally signed by MILIND NARAYAN HARDAS
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e89d616e518a9d873344ff99f204bc29ffa29c4859043f45c6e4dc620fbdecfa, pseudonym=E354473AF59FE844150B23A76627D03F020D24D4, serialNumber=C485F95F84F8E6C3499C670331170BBAEC4CF63CED24A2EA7672FABAAC6AD7FC, cn=MILIND NARAYAN HARDAS
Date: 2021.12.23 11:24:35 +05'30'

**( मिलिंद हरदास )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव यांचे स्वीय सहाय्यक.
२) मा.मुख्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
३) मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
४) मा.अ.मु.स.(सेवा) यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
५) मा.अ.मु.स.(वित्त), वित्त विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
६) मा.प्र.स.(मु.रा.अ.) यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
७) मा.सचिव, आयुक्त, राज्य निवडणूक आयोग, महाराष्ट्र
८) श्री.किरण कुरुंदकर, सचिव, राज्य निवडणूक आयोग.
९) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, मुंबई
१०) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र, मुंबई
११) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१२) निवासी व लेखा अधिकारी, मुंबई
१३) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१४) कक्ष अधिकारी, कार्यासन १०
१५) निवडनस्ती, कार्यासन ३७.